राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना औषधोपचार करण्यासाठी आर.जी.स्टोन युरोलॉजीकल रिसर्च इन्स्टिटयुट , मुंबई या संस्थेस शासन मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांकः एमएजी २००३/११/प्र.क्र.२/आरोग्य-३
सार्वजनिक आरोग्य विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - ९ मे, २००३

वाचा :- १) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.एमएजी १०९९/ प्र.क्र.२३८/ आरोग्य-३, दिनांक ३० ऑगस्ट १९९९.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक जीरुखा २०००/प्र.क्र. १०१/आरोग्य-३, दिनांक २६.९.२०००

३) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र. संआसे/आर.जी.स्टोन युरो.रिसर्च इन्स्टि.मुंबई/शामा/कक्ष-८ब/०२, दि.२६.१२.२००२.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी १०९९/प्र.क्र.३३७/आरोग्य-३, दिनांक ११ ऑगस्ट, १९९९ च्या परिच्छेद ७ मध्ये नमूद केल्यानुसार शासन मान्य खाजगी रुग्णालयाची यादी परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविण्यांत आली आहे. त्यामध्ये सुधारणा करुन आर.जी.स्टोन युरोलॉजीकल रिसर्च इन्स्टिटयुट, मुंबई या संस्थेस लिथोट्रिप्सी टेक्नॉलॉजीने (Lithotripsy Technology) मुत्रपिंडविषयक रोगांवर उपचारासाठी राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्यास सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक जीरुखा २०००/प्र.क्र.१०१/आरोग्य-३, दिनांक २६.९.२००० मधील मार्गदर्शक तत्वांच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यांत येत आहे.

२. उपरोल्लेखित संस्थेने आकारलेल्या संपूर्ण खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील. अतितात्काळ बाब वगळता सदर संस्थेतील मान्यता प्राप्त उपचाराखेरीज अन्य कोणत्याही औषधोपचारासाठी शासकीय कर्मचाऱ्यास प्राधिकृत वैद्यकीय अधिकाऱ्यांची पूर्वसंमती घेणे आवश्यक राहील.

३. हे आदेश मा.मुख्यमंत्री, मंत्री महोदय, महाराष्ट्र विधानमंडळाचे विरोधी पक्ष नेते महाराष्ट्र विधानसभेचे अध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषदेचे सभापती, उपसभापती तसेच महाराष्ट्र विधानसभा/परिषदेचे विद्यमान सदस्य, माजी सदस्य व त्यांच्या कुटुंबियांना सुध्दा अनुज्ञेय ठरविण्यांत येत आहे.

४. हे आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( भि.ब.महाले )

महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई.
सचिव, राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई (२ प्रती)
मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

सेटलमेंट कमिशनर अँण्ड डायरेक्टर ऑफ लँड रेकॉर्डस्, पुणे
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), नागपूर
महसंचालक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (१० प्रती)
चिफ ऑडिटर, लोकल फंडस् अकाऊंटस्, मुंबई (१० प्रती)
कोषागार अधिकारी (सर्व) (प्रत्येकी ५ प्रती)
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
संचालक, आयुर्वेद, मुंबई
संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन, परेल, मुंबई
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)

महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई
महसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय, (सर्व)

- प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
- प्राथोनोटरी व सिनियर मास्टर, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई

वित्त विभाग (कार्यासन सेवा-५), मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती रुग्णालय, मुंबई.
संचालक, आर.जी.स्टोन युरोलॉजीकल रिसर्च इन्स्टिटयूट, मुंबई
सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना कार्यासन), मंत्रालय, मुंबई.

२. मंत्रालयीन विभागाच्या सर्व आस्थापना कार्यासनास विनंती करण्यात येते की, त्यानी शासन निर्णयाच्या प्रती त्यांच्या सर्व संबंधित कार्यासनाना पाठवाव्यात. तसेच संबंधित कार्यासनाने त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना पाठवाव्यात.

प्रत निवडनस्ती (महत्वाचे आदेश) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय ,मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)